**उप प्रादेशिक परिवहन अधिकारी पदावर पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हिडी-१०१८/प्र.क्र.२३३/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २९ मे २०२०

**शासन निर्णय-**

मोटार वाहन विभागातील सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी या पदावरुन उपप्रादेशिक परिवहन अधिकारी या पदावर पदोन्नती देण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीने शिफारस केलेल्या निवडसुचीतील (निवडसूची २०१८-१९) खालील अधिकाऱ्यांना उपप्रादेशिक परिवहन अधिकारी या पदावर खुल्या प्रवर्गातून या आदेशात नमूद अटी/शर्तीच्या अधीन राहून तात्पुरत्या पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिका-याचे नाव | ज्येष्ठता क्रमांक | महसूली विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री. ज्ञानेश्वर एकनाथ हिरडे | २४ | अमरावती |
| २. | श्री. अनिल शांताराम अहेर | ३१ | कोकण-२ |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमीत करण्यात येतील.

३. सदरच्या तात्पुरत्या पदोन्नत्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहेत:-

(अ) उपरोक्त पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरुपात व मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाच्या अधिन राहून भरण्याबाबत साप्रवि/१६-ब यांनी दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या सुचनांनुसार देण्यात येत आहे. सदर आदेशाने पदोन्नतीचे आदेश बाधीत झाल्यास या आदेशान्वये पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना सेवाज्येष्ठता व तद्नुषंगीक आर्थीक लाभ मागण्याचा हक्क राहणार नाही.

(ब) पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या उपरोक्त अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. यास्तव या अधिकाऱ्यांना नियमीतपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(क) सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी या संवर्गातून उपप्रादेशिक परिवहन अधिकारी या संवर्गात पदोन्नत झालेल्या उपरोक्त अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमीत करण्यात येतील.

(ड) पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-२०१५/प्र. क्र. ३०३०/कार्या-१२, दि.१२.९.२०१६ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२९१३५३४८०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.06.08 14:53:49 +05'30'

**(द.ह. कदम)**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. संबंधित अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
४. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
५. सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, महाराष्ट्र राज्य (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. निवडनस्ती/परि-४